एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) अंतर्गत राज्य सेवा परीक्षा-२०२२ द्वारे शिफारसप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना प्रशिक्षाणासाठी जिल्हा वाटप करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. ससेनि-२०२४/प्र.क्र.१९७/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २६ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.७/१४/१८-ब, दि.२२.०४.२०१५
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-१११४/प्र.क्र.८३/१४/१८-ब, दि.०३.११.२०१४
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-०८१४/प्र.क्र.६४/१४/१८-ब, दि.११.११.२०१४
५) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-११२४/प्र.क्र.७५/प्रशि-२, दि.२१.०२.२०२५ व दि.१२.०३.२०२५
६) उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांचे दि.०४.०३.२०२५ व दि.१७.०३.२०२५ रोजीचे कार्यालयीन आदेश.

**<u>शासन आदेश</u>:-**

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत राज्य सेवा परीक्षा-२०२२ द्वारे शिफारसप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना सीपीटीपी-१० या तुकडीमध्ये प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यानुषंगाने, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील आदेशान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमध्ये तहसिलदार संवर्गातील २५ उमेदवारांना दि.०२.०४.२०२५ पासून दोन वर्षाच्या प्रशिक्षणासाठी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली आहे. तसेच, तहसिलदार संवर्गातील २५ परिविक्षाधीन अधिकारी यांनी दि.०२.०४.२०२५ रोजी सकाळी १०.०० वा. यशदा, प्रशिक्षण संस्था, पुणे येथे प्रशिक्षणासाठी रूजू होण्याबाबतच्या सुचना सामान्य प्रशासन विभागामार्फत दि.२१.०२.२०२५ व दि.१२.०३.२०२५ रोजीच्या आदेशान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.२१.०७.२०१७ व दि.२५.०९.२०१९ अन्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत यापूर्वी प्रशिक्षण पूर्ण केलेल्या गट-अ व गट-ब मधील प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना संवर्ग उन्नतीकरण होवून, गट-अ मध्ये समान / भिन्न संवर्गात नियुक्ती देण्यात आली असल्यास सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या टप्प्यामधून सूट देण्याबाबतच्या सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदरहू सुचनांनुसार उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांनी दि.०४.०३.२०२५ व दि.१७.०३.२०२५ रोजीच्या आदेशान्वये तहसिलदार संवर्गातील एकूण १२ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणातून सूट दिलेली आहे.

तसेच सूट देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी सदरहू आदेशातील विवरणपत्रात दिलेल्या निर्देशानुसार अनिवार्य प्रशिक्षण पूर्ण करण्याबाबत तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या निर्देशानुसार जिल्हा संलग्नतेच्या कार्यालयात रुजू होण्याच्या अनुषंगाने मूळ प्रशासकीय विभागाकडून दि.०२.०४.२०२५ पूर्वी आदेश प्राप्त करून घेण्याबाबत सुचित करण्यात आले आहे.

३. उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांच्या दि.०४.०३.२०२५ व दि.१७.०३.२०२५ रोजीच्या आदेशानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमधील सूट देण्यात आलेल्या तहसिलदार संवर्गातील १२ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करणे आवश्यक आहे.

४. त्यानुषंगाने एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमधील तहसिलदार संवर्गातील १२ परिविक्षाधीन उमेदवारांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी खालीलप्रमाणे जिल्हा वाटप करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | परिविक्षाधीन तहसिलदाराचे नाव | परिविक्षाधीन अधिकारी | | प्रशिक्षणासाठी जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|
| | | स्वजिल्हा | विभाग | प्रस्तावित जिल्हा | विभाग |
| १. | श्री.सोमेश सतेज मोहिते | सातारा | पुणे | जालना | छत्रपती संभाजीनगर |
| २. | श्री.योगेश मोहन गाडे | अहिल्यानगर | नाशिक | यवतमाळ | अमरावती |
| ३. | श्री.रोहित संजय शिंदे | लातूर | छत्रपती संभाजीनगर | यवतमाळ | अमरावती |
| ४. | श्री.महेश संतोष देशमुख | पुणे | पुणे | गोंदिया | नागपूर |
| ५. | श्री.शशिकांत बाजीराव जाधव | सातारा | पुणे | गडचिरोली | नागपूर |
| ६. | श्रीमती श्रध्दा शंकर चव्हाण | कोल्हापूर | पुणे | धाराशिव | छत्रपती संभाजीनगर |
| ७. | श्रीमती गिरिजादेवी गुरुनाथ लोखंडे | धाराशिव | छत्रपती संभाजीनगर | अकोला | अमरावती |
| ८. | श्रीमती तृप्ती संभाजी खैरनार | नाशिक | नाशिक | वाशिम | अमरावती |
| ९. | श्री.शुभम संजय काळे | नाशिक | नाशिक | छत्रपती संभाजीनगर | छत्रपती संभाजीनगर |
| १०. | श्री.हेमकृष्ण प्रेमलाल पिसादे | गोंदिया | नागपूर | अमरावती | अमरावती |
| ११. | श्रीमती निकिता निवृत्ती गद्रे | पुणे | पुणे | बुलढाणा | अमरावती |
| १२. | श्रीमती नेहा बालकराम मावस्कर | जळगांव | नाशिक | नागपूर | नागपूर |

५. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत सीपीटीपी-१० या तुकडीमधील उक्त तहसिलदार संवर्गातील परिविक्षाधीन उमेदवारांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यातील प्रशिक्षणासाठी पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून जिल्हा वाटप करण्यात येत आहे :

(१) उपरोक्त परिविक्षाधीन तहसिलदार यांना विविध विभागांतर्गत खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षण कार्यक्रमासंदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी परिविक्षाधीन तहसिलदार यांचा दि.०२.०४.२०२५ पासून प्रशिक्षण कार्यक्रम तात्काळ तयार करावा व त्याची प्रत परिविक्षाधीन तहसिलदार यांना उपलब्ध करून द्यावी.

(२) परिविक्षाधीन तहसिलदार यांनी दैनंदिन रोजनिशी दररोज न चुकता ई-मेलद्वारे संबंधित जिल्हयातील निवासी तहसिलदार व संपर्क/ समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांना सादर करावी.

(३) विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे. तसेच, प्रशिक्षणार्थींवर प्रत्येक महिन्यात केलेल्या कामकाजाचे मूल्यमापन व अनुभवाच्या आधारावर मासिक अहवाल घ्यावा व सदर अहवालाचे मूल्यमापन करावे. प्रत्येक महिन्यास याचा अहवाल प्रमाणित करून सामान्य प्रशासन विभागाकडे पाठवावा.

(४) परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या दैनंदिन उपस्थिती/ अनुपस्थिती/ वर्तन इ. बाबत संबंधित जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांनी समन्यय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांना अहवाल सादर करावा.

(५) प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थीने गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा घटना त्वरित संबंधित जिल्हाधिकारी यांनी समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) / विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांच्याशी संपर्क साधून निदर्शनास आणून देण्यात याव्यात. या संबंधित अहवाल समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांनी शासनाच्या महसूल व वन विभाग व सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

(६) परिविक्षाधीन तहसिलदार यांना प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या विभागातील विभागीय आयुक्त यांच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत. प्रशिक्षणार्थीना वाटप केलेल्या विभागातील परिविक्षाधीन तहसिलदार यांचे वेतन व भत्ते संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत अदा करण्यात येतील.

(७) खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणा-या परीक्षा प्रशिक्षणार्थीनी विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

(८) विभागीय प्रशिक्षणाच्या टप्प्यांमध्ये परिविक्षाधीन उप जिल्हाधिकान्यांचे मुल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र टीआरएन-१११४/ प्र.क्र.८४/२८-ब, दि.२२.०४.२०१५ मधील निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांची राहील.

(९) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-०४१५/प्र.क्र.१२२/ई-२, दि.१५.०९.२०१५ नुसार परिविक्षाधीन तहसिलदार यांना वाटप केलेल्या विभागातील समन्वय अधिकारी म्हणून उपायुक्त (महसूल) विभागीय आयुक्त कार्यालय यांची नेमणूक करण्यात आली आहे. त्यानुसार समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांनी प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी योग्य ती दक्षता घ्यावी.

(१०) परिविक्षाधीन तहसिलदारांना केवळ प्रशिक्षणासाठीच जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

(११) परिविक्षाधीन तहसिलदार यांनी प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या जिल्ह्यात दि.०२.०४.२०२५ पासून रुजु व्हावे व तसा अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. (१२) सदर जिल्हा संलग्नता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.०२.२०२५ रोजीच्या आदेशामधील परिच्छेद ३ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. तसेच, सदर उमेदवारांनी उप महासंचालक तथा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांच्या दि.०४.०३.२०२५ व दि.१७.०३.२०२५ रोजीच्या आदेशासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२५०३२६१८२७५६१३१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2025.03.26 18:28:55 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) महासंचालक, यशदा, पुणे.
३) सर्व विभागीय आयुक्त.
४) सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
५) सह सचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) संबंधित प्रशिक्षणार्थी.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).